**कोविड-१९ साथरोग प्रादुर्भावाच्या पार्श्वभुमीवर महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत हमी तत्वावर उपचाराच्या दाव्याची अंगीकृत रुग्णालयास प्रतीपुर्ती करण्यासाठी २२१० जी २८९ (TSP) या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः मफुयो-२०२१/प्र.क्र. ११६/आरोग्य-६

गो.ते. रुग्णालय आवार, १० मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
दिनांक: २० डिसेंबर, २०२१

**वाचा :-**

१) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.७४/आरोग्य-६, दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९.
२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक: अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि. १६ एप्रिल, २०२०.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक : अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि. ०४ मे, २०२०.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४ जून, २०२१.
५) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०१८/प्र.क्र.८०/आरोग्य-६, दिनांक २३ मे, २०२०.
६) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. रास्वयो-२०२०/प्र.क्र.८०(भाग-१)/आरोग्य-६, दिनांक २६ ऑगस्ट, २०२१
७) मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी यांचे पत्र क्रमांक : राआहसो/लेखा/प्रअ/९८४०/१६६२/२०२१, दिनांक १३.१०.२०२१.
८) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्रमांक: बीयुडी-२०२१/प्र.क्र.५/कार्यासन-६, दि. १४ डिसेंबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यामध्ये दिनांक २६ फेब्रुवारी, २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारित महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेशी आयुष्मान भारत-प्रधानमंत्री जन आरोग्य योजना संलग्नीकरण करुन एकत्रित स्वरुपात मे. युनायटेड इंडिया इन्श्युरन्स कंपनीच्या सहकार्याने दिनांक ०१.०४.२०२० पासून अंमलात आली आहे.

२. कोविड-१९ साथरोगाची राज्यातील परिस्थिती पाहता महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेची व्याप्ती दिनांक २३ मे, २०२० च्या शासन निर्णयान्वये वाढविण्यात आली असून सदर योजना राज्यातील सर्व नागरिकांसाठी राज्यातील पुरावाजन्य कागदपत्राचे आधारावर लागू करण्यात आली आहे.

३. दिनांक २३ मे, २०२० च्या शासन निर्णयातील परिशिष्ट -क मध्ये समाविष्ट असलेले काही किरकोळ व काही मोठे उपचार व काही तपासण्या ज्या महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजना व प्रधानमंत्री जन आरोग्य योजनेंतर्गत समाविष्ट नाहीत. त्या उपचार व तपासण्या (एकूण ६७ उपचार)

सदरील योजनेंतर्गत अंगीकृत रुग्णालयांमध्ये सर्व लाभार्थ्यांना (योजनेंतर्गत लाभार्थी असलेले व लाभार्थी नसलेले) CGHS च्या दरानुसार (NABH/NABL) उपलब्ध करुन देण्यास देखील शासन मान्यता दिली आहे. सदर खर्चाची प्रतिपूर्ती संबंधित रुग्णालयास राज्य आरोग्य हमी सोसायटी मार्फत करण्यात येणार आहे.

४. मे. युनायटेड इंडिया इन्श्युरन्स कंपनीसोबत झालेल्या सांमजस्य करारातील तरतुदीनुसार महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या लाभार्थ्यांपैकी Category-B &C मध्ये समाविष्ट लाभार्थ्यांना हमी (Assurance) तत्त्वावर विमा संरक्षण पुरविण्यात येत आहे.

५. सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय दिनांक २३.०५.२०२० अन्वये घेण्यात आलेल्या निर्णयास वेळोवेळी मुदतवाढ देण्यात आली आहे. दि.११.०५.२०२१ च्या शासन निर्णयान्वये सदर योजनेस खाजगी अंगीकृत रूग्णालयांना खुले करण्यात आलेले १२० उपचार वगळून उर्वरीत बाबी कायम ठेवून दि.०१.०४.२०२१ ते.दि.३०.०६.२०२१ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात आली होती. तसेच शासन निर्णय दिनांक २६ ऑगस्ट, २०२१ अन्वये दिनांक ०१ जुलै, २०२१ ते दिनांक ३० सप्टेंबर, २०२१ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली आहे.

६. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेच्या अंमलबजावणीसाठी सन २०२१-२२ या वित्तीय वर्षासाठी २२१० जी २८९, या लेखाशिर्षाखाली रू. ५० कोटी, जुलै, २०२१ मध्ये पुरवणी मागणीद्वारे रू. ३० कोटी असा एकूण रु. ८० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. सदर अर्थसंकल्पीत निधीपैकी दि.०३.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू. २५,०३,२१,२१७/-, दि.०८.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.१,११,५६,०८५/- व दि.०९.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रू.२५,०३,२१,२१७/- असा एकूण रू.५१,१७,९८,५१९/-इतका निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरीत करण्यात आला आहे.

७. महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत दि.०१.०२.२०२१ ते दि.३१.०३.२०२१ व दि.०१.०४.२०२१ ते दि.३०.०६.२०२१ पर्यंतच्या हमी तत्वावरील दाव्यांची अंगीकृत रुग्णालयास प्रतिपुर्ती करण्यासाठी एकूण रु.१,५४,४७,४०८/-(अक्षरी रुपये एक कोटी चोपन्न लक्ष सत्तेचाळीस हजार चारशे आठ फक्त) इतका निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीस वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत दि.०१.०२.२०२१ ते दि.३१.०३.२०२१ व दि.०१.०४.२०२१ ते दि.३०.०६.२०२१ या कालावधीत अनुसूचित जमातीच्या प्रत्यक्षात लाभ घेतलेल्या एकूण रु.१,५४,४७,४०८/- इतक्या रकमेच्या हमी तत्वावरील उपचारांना पुर्वमान्यता (Preauth) देण्यात आली असून त्याआधारे अंगीकृत रुग्णालयांकडून दावे सादर करण्यात येत आहेत.

२. राज्य आरोग्य हमी सोसायटीकडील उपलब्ध तपशील व सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पित तरतूदीनुसार महात्मा ज्योतिराव फुले जन आरोग्य योजनेंतर्गत हमी तत्वावर अंगीकृत रुग्णालयात वैद्यकीय उपचार पुरविण्यात येत असलेल्या लाभार्थ्यांच्या खर्चाची (दाव्यांची) संबंधित अंगीकृत रुग्णालयांना प्रतीपुर्तीकरीता खालील नमूद केलेल्या लेखाशिर्षांतर्गत रु. १,५४,४७,४०८/- (अक्षरी रुपये एक कोटी चोपन्न लक्ष सत्तेचाळीस हजार चारशे आठ फक्त) एवढा सशर्त निधी राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या खात्यावर तात्काळ वर्ग करण्यासाठी नियंत्रक अधिकाऱ्याकडे सुपुर्द करण्यात येत आहे. सदर रक्कमेचा धनादेश राज्य आरोग्य हमी सोसायटीच्या नावे काढण्यात यावा.

मागणी क्रं. टी-०५
२२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०३ - ग्रामीण आरोग्य सेवा - विषम चिकित्सा
७९६- जनजाती क्षेत्र उपयोजना
(०१)- जनजाती क्षेत्र उप योजनांतर्गत योजना
(०१) (०६) - महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना (राज्य योजना)(टीएसपी)
२२१० जी २८९ (दत्तमत) ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)

३. सदर निधी सोसायटीकडे वर्ग करण्यास अनुदानाचे देयक अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे सादर करण्यासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तसेच सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई हे नियंत्रक अधिकारी असतील.

४. आदिवासी उप योजनेंतर्गत उपलब्ध झालेला निधी खर्च करताना आदिवासी विकास विभागाच्या दिनांक १४.१२.२०२१ च्या शासन निर्णयामध्ये नमूद सर्व अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन राज्य आरोग्य हमी सोसायटीने करावे.

५. वित्त विभागाच्या दिनांक १६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकान्वये दिलेल्या सुचनांचे सर्व संबंधितानी काटेकोरपणे पालन करावे. तसेच प्रमाणित करण्यात येते की, सदर परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील नमुद अटींची पुर्तता झाली आहे.

६. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाच्या दिनांक १४.१२.२०२१ च्या शासन निर्णयानुसार व वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र.९८१/व्यय-१४, दिनांक १०.११.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०२११२२०१५३०५९९६१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Dattaram Mahadeshwar

Digitally signed by Sanjay Dattaram Mahadeshwar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759d43d3ca03f08520a6d49169531e74206cd390898bbe0690fead8f00f6a3eb, pseudonym=80E93D8EE476E7190080D9A7194A8F4C4198CFFD, serialNumber=09A8917EDE715503310B61D8A24357A945B188F3A254ABA25AC8365BB66E4EE8, cn=Sanjay Dattaram Mahadeshwar
Date: 2021.12.20 16:21:15 +05'30'

**(संजय महाडेश्वर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, लेखा परीक्षा/ लेखा व अनुज्ञेयता, मुंबई.
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, राज्य आरोग्य हमी सोसायटी, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
७. सहसंचालक, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई (३ प्रती).
९. नियोजन विभाग (कार्यासन१४७२), मंत्रालय, मुंबई.
१०. आदिवासी विकास विभाग (कार्यासन-६),मंत्रालय,मुंबई.
११.वित्त विभाग, कार्यासन - व्यय -१३/अर्थसंकल्प-९, मंत्रालय, मुंबई-३२.
१२.अर्थसंकल्प शाखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती.